पवन बहुउद्देशिय शिक्षण व सामाजिक विकास संस्था व्दारा संचालित चेतना फिजिओथेरेपी कॉलेज, वर्धा यांना सामान्य रुग्णालय, वर्धा येथील खाटा शैक्षणिक प्रयोजनासाठी वापरण्यास मंजूरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः खाशैप्र -२०२१ /प्र.क्र. ४२/आरोग्य-३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.

दिनांक : ३१ जानेवारी, २०२२

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-एचएसजी १६९०/प्र.क्र.९६/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.१९९०.

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-संकिर्ण २०१३/प्र.क्र.३०७/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.२०१३.

३) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- आआसे/कक्ष-३/चेतना फिजिओथेरेपी कॉलेज, वर्धा/१७८४८-४९/२१, दिनांक-२२.१०.२०२१.

प्रस्तावना -

पवन बहुउद्देशिय शिक्षण व सामाजिक विकास संस्था व्दारा संचालित चेतना फिजिओथेरेपी कॉलेज, वर्धा या खाजगी प्रशिक्षण संस्थेस सामान्य रूग्णालय, वर्धा येथील ३०० खाटा शैक्षणिक प्रयोजनार्थ अनुभवासाठी वापरण्यास परवानगी ३ वर्षाकरीता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

पवन बहुउद्देशिय शिक्षण व सामाजिक विकास संस्था व्दारा संचालित चेतना फिजिओथेरेपी कॉलेज, वर्धा येथील ३०० खाटा शैक्षणिक प्रयोजनार्थ अनुभवासाठी प्रतिदिन प्रतिखाट रुपये १५०/- इतक्या दराने वापरण्यास ३ वर्षाकरीता या शासन निर्णयान्वये पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय, दि.०३.०८.२०१३ नुसार खाटांसाठी आकारावयाचे शुल्क रुपये १५०/- प्रतिदिन प्रतिखाटा याप्रमाणे संस्था दर तिमाहीच्या पहिल्या महिन्याच्या पहिल्या आठवडयात,तीन महिन्याच्या कालावधीसाठी अग्रिम स्वरुपात चुकते करील. खाटा वापरण्याच्या कालावधीत शासन ठरविल ते सुधारीत शुल्क त्या दिनांकापासून चुकते करण्याचे संस्थेवर बंधनकारक राहिल. तसे न केल्यास ही व्यवस्था रद्द करण्यात येईल व याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम राहिल.

२) उपरोक्त दिनांक ०३.०८.१९९० येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या करारपत्राच्या विहित नमून्याप्रमाणे संस्थेने जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, वर्धा नाशिक यांचे समवेत करारपत्र करुन ते नोंदणीकृत करुन घ्यावे व या करारपत्रातील कोणत्याही अटींचे पालन न केल्यास किंवा अटीचा भंग झाल्यास ही व्यवस्था रद्द करण्यात येईल व याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम असेल.

३) या संदर्भात सार्वजनिक आरोग्य विभाग आणि वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग ह्यांनी वेळोवेळी निर्देशीत केल्याप्रमाणे अन्य अटी व शर्तींचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहिल.

३. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, वर्धा यांनी विहित अटी व शर्तींच्या अधिन राहून संबंधीत संस्थेकडून करारपत्र करुन शैक्षणिक प्रयोजनार्थ अनुभवासाठी सुरुवातीस ३ वर्षाकरीता खाटांचा वापर करण्यास परवानगी द्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१५०१३८७९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2022.01.31 15:10:45 +05'30'

**(रो.दि.कदम पाटील)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.

२. संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई

३. सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.

४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) पुणे

५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.

६. जिल्हा शल्य चिकित्सक, वर्धा

७. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा.

८. प्राचार्य, पवन बहुउद्देशिय शिक्षण व सामाजिक विकास संस्था व्दारा संचालित चेतना फिजिओथेरेपी कॉलेज, वर्धा

९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.

१०. निवडनस्ती (आरोग्य-३)